कोविड-१९ उपाययोजनेंतर्गत औषधे / सर्जिकल बाबी आणि RTPCR कंझ्युमेबल्सची खरेदी हाफकिन महामंडळाकडून करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
रू. ४५.७८ कोटी

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
शासन निर्णय क्रमांकः कोविड-२०२१/प्र.क्र. २११ /प्रशासन-२
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: १३ ऑक्टोबर , २०२१

वाचा :-

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दि. १७.०४.२०१५
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. खरेदी २०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दि. २६.०७.२०१७
४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. २१५/उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७
५) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य यांच्या अध्यक्षतेखाली दि. ३१.०८.२०२० रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
६) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्र. कोविड-२०२०/प्र.क्र.२०८/प्रशा-२ , दि. ०२.०९.२०२०.
७) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/कोविड-१९/ म्युकरमायकोसिस /औषधी बाबी/औखक/११९५४/२०२१, दि. १६.०९.२०२१
८) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/कोविड-१९/म्युकरमायकोसिस / RTPCR Consumables /औखक/ १६८५०/ २०२१, दि. २३.०९.२०२१

प्रस्तावना :-

संचालक, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांनी दि. १६.०९.२०२१ व दि. २३.०९.२०२१ रोजीच्या पत्रांन्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुसरून कोविड-१९ तसेच म्युकरमायकोसिसचा प्रादुर्भाव

रोखण्याच्या अनुषंगाने औषधे व सर्जिकल बाबी यासाठी रू. ५.९६ कोटी आणि तसेच, RTPCR कंझ्युमेबल्स खरेदीसाठी रु ३९.८२ कोटी अशा प्रकारे एकूण रु. ४५.७८ कोटी इतक्या बाबींची खरेदी हाफकिन महामंडळ, मुंबई यांचेकडून करण्याकरिता येणाऱ्या खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात कोविड-१९ उपाययोजनेसाठी संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांच्या मागणी क्र. एस-०१, २२१०-३३१४ या लेखाशीर्षाच्या, (२१) सामुग्री व पुरवठा उद्दिष्टांतर्गत जुलै २०२१ च्या पावसाळी अधिवेशनात रु.१८०.०० कोटी इतका निधी पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आला आहे. त्या अनुषंगाने संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांनी प्रस्तावित केल्यानुसार, "परिशिष्ट-अ" मध्ये नमूद औषधे व सर्जिकल बाबी यासाठी रू. ५.९६ कोटी आणि "परिशिष्ट-ब" मध्ये नमूद RTPCR कंझ्युमेबल्स खरेदीसाठी रु ३९.८२ कोटी अशा एकूण अंदाजित रु. ४५.७८ कोटी इतक्या रकमेच्या बाबींची हाफकिन महामंडळाकडून खरेदी करण्यास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक २६.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रूग्णालये आणि संस्था यांना लागणारी औषधी व सर्जिकल साहित्य, रसायने व उपकरणे इत्यादी बाबींची खरेदी हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळाकडून करणे बंधनकारक करण्यात आलेले आहे. त्यानुसार खरेदी करण्यात यावी.

२) सदर औषधे / सर्जिकल बाबी आणि RTPCR कंझ्युमेबल्स इत्यादी बाबींची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा संचालनालयाने केलेली आहे.

३) सदरहू औषधे / सर्जिकल बाबी आणि RTPCR कंझ्युमेबल्स इत्यादी बाबींची विर्निदिष्टे व्यापक व सर्वसमावेशक असून त्यानुसार सदर बाबींचा पुरवठा करू शकणारे किमान तीन उत्पादक पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, याची खातरजमा करण्यात आलेली आहे.

४) सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठी कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र८२/भाग/उद्योग-४, दि. ०१.१२.२०१६ व अनुषंगिक शासन निर्णयातील नमूद विहित कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

५) या बाबींची खरेदी प्रक्रिया GeM पोर्टल / महाटेंडर द्वारे करावी.

६) सदर खरेदीसाठी प्रस्तावित केलेल्या बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) उक्त बाबींची तांत्रिक विर्निदिष्टे (technical specifications) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांनी राष्ट्रीय विषाणू प्रयोगशाळा, पुणे (NIV) / राष्ट्रीय प्रजनन स्वास्थ्य संशोधन संस्था, मुंबई (NIRRH) यांच्याकडून प्रमाणित करून घेणे आवश्यक आहे.

८) खरेदीविषयक बाबींची द्विरूक्ती (duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

9) संचालक, वैद्यकीय शिक्षण यांनी तातडीने लागणाऱ्या बाबींची मागणी तात्काळ हाफकिन महामंडळाकडे नोंदवावी. तसेच, प्रत्येक महिन्याला लागणाऱ्या बाबींची मागणी किमान १५ दिवस आधी हाफकिन महामंडळाकडे नोंदवावी.

१०) हाफकिन महामंडळाने उपरोक्त बाबींच्या खरेदीसाठी GeM / Mahatender द्वारे निश्चित केलेल्या पुरवठादारास एकाच वेळी पुरवठा आदेश न देता, याबाबत संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन यांच्याकडून प्रतिमाह प्राप्त होणाऱ्या मागणीनुसार मासिक तत्त्वावर पुरवठा आदेश निर्गमित करावेत.

११) हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळाकडून सदर औषधे / सर्जिकल बाबी आणि RTPCR कंझ्युमेबल्स बाबी प्राप्त करून घेण्यासाठी तात्काळ पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यात यावी.

१२) कोणत्याही परिस्थितीत उपलब्ध निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च करण्यात येऊ नये.

१३) संचालक, वैद्यकीय शिक्षण, मुंबई यांनी त्यांच्या २२१०-३३१४ या लेखाशीर्षाखाली कोविड-१९ चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी जुलै २०२१ च्या विधानमंडळाच्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणी द्वारे मंजूर निधीपैकी रु. ४५.७८ कोटी इतका निधी तात्काळ हाफकिन महामंडळाकडे वर्ग करावा.

१४) हाफकिन महामंडळाने प्रत्येक वेळी निविदा करताना उपलब्ध असलेल्या औषधे / सर्जिकल बाबी आणि RTPCR कंझ्युमेबल्स बाबींचा साठा व विधिग्राह्य कालावधी (expiry date) विचारात घेऊनच निविदा प्रसिध्द करावी.

१५) सदर औषधे, सर्जिकल बाबी आणि RTPCR कंझ्युमेबल्सची मागणी ई औषधी या प्रणालीवर नोंदविण्यात यावी.

२. उपरोक्त अनुक्रमांक १ ते १५ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेप्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई व सहसंचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय (खरेदी कक्ष) मुंबई यांची राहील.

३. उपरोक्त बाबी खरेदीसाठी येणारा खर्च संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांच्या पुढील लेखाशीर्षामधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक - एस-१

२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१-नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा

०१- संचालन व प्रशासन

(००)(०१)- संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.

(२२१० ३३१४)

२१- सामुग्री व पुरवठा

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दि. १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-२, अनुक्रमांक-४, नियम क्रमांक -७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१२१७०९३१५४१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO JOGDAND

Digitally signed by MAHADEO JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, pseudonym=85719993A847361CF1CE96786397786A408A4972, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO JOGDAND
Date: 2021.10.13 15:03:06 +05'30'

सोबत :- परिशिष्ट अ- व परिशिष्ट-ब

म. गि. जोगदंड
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन जीव औषध निर्माण महामंडळ, मुंबई
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. सर्व अधिष्ठाता / अधीक्षक, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालय
८. निवडनस्ती (प्रशासन -२)

| शासन निर्णय क्र.कोविड-२०२१/प्र.क्र. २११ /प्रशासन-२, दि. १२ ऑक्टोबर, २०२१ सोबतचे परिशिष्ट-अ | | | | |
|---|---|---|---|---|
| Sr No | Name of Item | Approx. Qty. for 6 months | Approx. Rate per Pc | Total Amount (in Rs.) |
| 1 | Inj Meropenem 1 gm | 143500 | 139.74 | 20052690 |
| 2 | Inj Piperacilin 4 gm + Tazobactum 0.5 mg (vial) | 439290 | 54.488 | 23936034 |
| 3 | Amoxycillin + Calvulanic Acid 1.2 gm (Amoxycillin Sodium 1000 mg + Clavulanic Acid as Potassium salt 200 mg i.e. 1.2 gm in vial Inj) | 122000 | 29.0304 | 3541709 |
| 4 | LV. Metronidazole 5 mg/ml, 100 ml | 205000 | 6.899 | 1414295 |
| 5 | Tab Amoxycillin 500 +Clavulanic acid 125 mg | 560000 | 4.5078 | 2524368 |
| 6 | Tab Azithromycin 500 mg | 160000 | 6.6976 | 1071616 |
| 7 | I.V. Dextrose 5% 500 ml | 53000 | 21.112 | 1118936 |
| 8 | I.V.Dextrose 5% sodium chloride 0.9% 500 ml | 131500 | 12.81 | 1684515 |
| 9 | Disposable Syringes without needle 2ml | 410000 | 0.94 | 385400 |
| 10 | Disposable Syringes without needle 5ml | 350000 | 1.31 | 458500 |
| 11 | Disposable Syringes without needle 10ml | 360000 | 2.07 | 745200 |
| 12 | Inj Ondensetron 2mg/ml 2mlAmp | 120000 | 1.8144 | 217728 |
| 13 | Tab B complex N.F.I. | 4120000 | 0.2486 | 1024232 |
| 14 | Disposable Needle 20g(Sterile) Individuallv packed I.P. | 425850 | 0.481 | 204833.9 |
| 15 | Disposable Needle 21g(Sterile) Individuallv packed I.P. | 576000 | 0.481 | 277056 |
| 16 | Disposable Needle 22g(Sterile) Individuallv packed I.P. | 700000 | 0.481 | 336700 |
| 17 | Disposable Needle 23g(Sterile) Individuallv packed I.P. | 595000 | 0.481 | 286195 |
| 18 | Disposable Needle 24g(Sterile) Individuallv packed I.P. | 639986 | 0.5 | 319993 |
| | Total | | | 59600000 |

| शासन निर्णय क्र.कोविड-२०२१/प्र.क्र. २११ /प्रशासन-२, दि. १२ ऑक्टोबर, २०२१ सोबतचे परिशिष्ट-ब | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| Sr. No | Name of Item and Specification | Unit | Pack Size | Total Requirement | Rate per unit (Rs) | Total Amount (in Rs.) |
| 1 | Sterile micropipette Tips made of virgin Polypropylene, Graduated, 0.2- 10 µL, Clear Low Retention, Filtered, RNAse and DNAse Free, Racked | Single tip | 960 | 2976480 | 4.22 | 12560746 |
| 2 | Sterile micropipette Tips made of virgin Polypropylene, Graduated, 0.2- 20 µL, Clear Low Retention, Filtered, RNAse and DNAse Free, Racked | Single tip | 960 | 2839200 | 4.31 | 12236952 |
| 3 | Sterile micropipette Tips made of virgin Polypropylene, Graduated, 2- 200 µL, Clear Low Retention, Filtered, RNAse and DNAse Free, Racked | Single tip | 960 | 5815680 | 4.22 | 24542170 |
| 4 | Sterile micropipette Tips made of virgin Polypropylene, Graduated, 100- 1000 µL, Clear Low Retention, Filtered, RNAse and DNAse Free, Racked | Single tip | 960 | 3916224 | 4.22 | 16526465 |
| 5 | Extra long barriertips sterile 1000 ul Clear Sterile Low Retention, RNAse and DNAse Free, Racked | Single tip | 960 | 3327168 | 4.22 | 14040649 |
| 6 | 2 ml tubes made of virgin Polypropylene, Clear,RNAse and DNAse Free | single tube | 500 | 2723500 | 1.56 | 4248660 |
| 7 | 2 ml Cryovials, suitable for storage in -80$^{o}$C and liquid nitrogen, RNAse and DNAse Free. | single cryovial | 500 | 1784900 | 14.16 | 25274184 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 8 | Cryoboxes for storage of samples (100 place for upto 2ml of tubes) | single cryobox | 10 | 21710 | 421.85 | 9158364 |
| 9 | Adhesive Plate Sealer for 96 well plates | single plate sealer | 100 | 118820 | 71.39 | 8482560 |
| 10 | Optical Adhesive Plate Sealer lightcycler 480 sealing foil High quality sealing. | single palte sealer | 100 | 33150 | 116.82 | 3872583 |
| 11 | qPCR seal sheets (140mm X 77 mm) | single sheet | 100 | 16640 | 77.88 | 1295923 |
| 12 | Strip tubes and cap 0.1 ml (rotorgene PCR) | single tube and cap | 250 | 162500 | 12.18 | 1979250 |
| 13 | 0.1 ml PCR strip with cap compatible with ABI machine | single PCR strip with cap | 120 | 156000 | 38.70 | 6037200 |
| 14 | 0.2 ml PCR strip with cap compatible with Quantstudio 5 machine | single PCR strip with cap | 120 | 3120000 | 46.88 | 146265600 |
| 15 | 0.1 ml 96 well PCR plates half skirted compatible with Roche machine, white | single plate | 50 | 68250 | 246.62 | 16831815 |
| 16 | 0.1 ml 96 well PCR plates semi skirted compatible with ABI machine pack of 25 | single plate | 50 | 3250 | 246.62 | 801515 |
| 17 | 0.1 ml 96 well PCR plates semi skirted compatible with ABI machine pack of 50 | single plate | 50 | 1950 | 246.62 | 480909 |
| 18 | 0.1 ml 96 well PCR plates semi skirted compatible with ABI machine pack of 100 | single plate | 50 | 46800 | 246.62 | 11541816 |
| 19 | Biorad hard white shell PCR plates 96 well, clear well thin wall | single plate | 50 | 28600 | 220.66 | 6310876 |
| 20 | Light cycler 480 multiwell plate 96, white | single plate | 50 | 13000 | 246.62 | 3206060 |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| 21 | 0.2 ml 96 well PCR plates semi skirted compatible with quantstudio 5 machine pack of 25 | single plate | 50 | 78000 | 188.80 | 14726400 |
| 22 | 0.2 ml 96 well PCR plates semi skirted compatible with quantstudio 5 machine pack of 50 | single plate | 50 | 78000 | 188.80 | 14726400 |
| 23 | 0.2 ml 96 well PCR plates semi skirted compatible with quantstudio 5 machine pack of 100 | single plate | 50 | 130000 | 188.80 | 24544000 |
| 24 | Absolute alcohol (Ethanol 99.9% laboratory grade for molecular lab 500 ml | 500 ml bottle | 1 | 10000 | 1121.00 | 11210000 |
| 25 | Rnase away for molecular testing (Removes RNase and DNA contamination 500 ml | 500 ml bottle | 1 | 3000 | 1770.00 | 5310000 |
| 26 | Nitrile gloves powder free for molecular testing free size | one pair | 100 | 100000 | 20.16 | 2016000 |
| | | | | | | 398227096 |